## महाराष्ट्र शासन

क्रमांक: देयक-२०२२/प्र.क.७६/१३ अे
कृषि व पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व
मत्स्यव्यवसाय विभाग
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: २१ एप्रिल, २०२२

**विषय**:- सन २०१९-२०२० व २०२०-२१ मध्ये जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, अकोला कार्यालयाच्या व कृषि पर्यवेक्षक तालुका बीज गुणन प्रक्षेत्र, बोरगाव मंजू, जि.अकोला प्रक्षेत्रावरील २४०१ ०२६१ लेखाशिर्षा खालील (२१) साधन सामुग्री व पुरवठा या बाबीखालील प्रलंबित सामुग्री व पुरवठ्याचे रु.४८,४२५/- देयकास प्रशासकीय मंजूरी मिळण्याबाबत.

**संदर्भ**:- १) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३२०/ २०१३/विनियम, दि.१७/४/२०१५.
२) कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.कृषि/लेखा-१/आस्था/देयक/मंजूरी/ अमरावती/९६०१/२०२२, दि.११/०३/२०२२

**ज्ञापन** :

सन २०१९-२०२० व २०२०-२१ मध्ये जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, अकोला कार्यालयाच्या व कृषि पर्यवेक्षक तालुका बीज गुणन प्रक्षेत्र, बोरगाव मंजू, जि.अकोला या प्रक्षेत्रावरील बिजोत्पादन कार्यक्रम व इतर अनुषंगिक कामे कंत्राटदारामार्फत घेतली जातात. सदर कत्रांटदारांच्या प्रलंबित साधन सामुग्री व पुरवठा कामाचे देयके रु.४८,४२५/- (अक्षरी रुपये अठ्ठेचाळीस हजार चारशे पंचवीस फक्त) अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक १७/४/२०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला, उपविभाग-१ अनुक्रमांक-६, नियम ४० नुसार प्रशासनिक विभाग प्रमुख यांना पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत. त्या अधिकारानुसार सदर ज्ञापन निर्गमित करण्यात येत आहे.

३. यावरील येणारा खर्च मागणी क्र.डी-३, २४०१-पिकसंवर्धन, १०३-बी बीयाणे, १०३ (००) (०१) तालुका बीज गुणन प्रक्षेत्र (२४०१ ०२६१) अंतर्गत २१-साधन सामुग्री व पुरवठा या बाबीखाली सन २०२२-२०२३ करिता उपलब्ध असलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

४. आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर निधी ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी वापरण्यात येईल, याची दक्षता घ्यावी. तसेच या प्रकरणी कोणतीही प्रशासकीय व वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी, तसे, आढळल्यास याबाबतची जबाबदारी सर्व संबंधितावर राहील.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२२०४२११३२१५०२७०१ असा आहे. हे ज्ञापन डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

HEMANT GORAKHNATH MHAPANKAR

Digitally signed by HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=1775f5c28a439e88c4c15ab3f88d6a6beb26ad2675a8c7a7ff397b2e5305303d, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=6756123D309547BB1E152A6AEB6042BDE4040836DF541FD3620CA87FF8E71CC5, cn=HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
Date: 2022.04.21 13:23:40 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. आयुक्त कृषी, महाराष्ट्र राज्य,पुणे.
२. संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन), कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे,
३. विभागीय कृषी सहसंचालक,अमरावती विभाग, अमरावती.
४. जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,अकोला.
५. उप विभागीय कृषि अधिकारी, अकोला.
६. महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर,
७. महालेखापाल-१/२ , (लेखा परीक्षा ) मुंबई /नागपूर,
८. वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला.
९. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१०.सहसंचालक लेखा व कोषागारे, संगणक कक्ष,नवीन प्रशासन भवन,५ वा मजला,मुंबई-३२.
११.निवड नस्ती (१३-अे)